ई-साहित्य प्रतिष्ठान

# नाते चंद्राचे



मध्यान रात्री
निशःब्द काळजाला
चंद्र येतो भेटीला......
चंद्र असतो साक्षीला.......




ई-साहित्य प्रतिष्ठान

वर्ष तिसरे, अंक – ६ वा,

१ फेब्रुवारी २०११


**<u>चित्र सौजन्य</u>**

अनुराग कौशिक

‘चंद्र’, ‘चांदोबा’ किंवा ‘चंदामामा’ अगदी लहानपणापासून सर्वांच्याच आवडीचा.

अगदी लहानग्या बाळाला म्हणलेली अंगाई - त्याच्या आईला आपले बाळ

‘मेरा चंदा है तू , मेरा सुरज है तू’ असे वाटते  तर एखादे  दुडुदुडु

धावणारे मुल

निळ्या निळ्या आभाळी,  चांदोमामा जवळी ।

जाऊ का ग आई गंमत पहाण्यासी ।।

असे म्हणत  त्या चंदामामाच्या दिशेने झेपावते

किंवा

आपल्या प्रियतमेला ‘चौदहवी का चांद’ म्हणणारा प्रियकर तिला मनवण्यासाठी

चांद छुपा बादल मे , शरमा के मेरी जाना । असं म्हणो

कधी एखादी लाजरी बुजरी प्रियतमा आपल्या प्रियकराला

चांदण्यात  फिरताना माझा धरलास हात

सखया रे आवर ही , सावरही चांदरात ।। म्हणो.

शेवटी काय अगदी लहानापासून मोठ्यांपर्यंत आपल्या मनातले चंद्राचे स्थान अबाधित आहे.

तर अशा लाडक्या चंद्राच्या कविता घेऊन आम्ही आलो आहोत......अशाच एका चंद्रा सोबत

**'आवाज़ का जादू'** हे नाव ज्याला सार्थ ठरेल असं नाव म्हणजे चंद्रशेखर महामुनी.



'निषाद, पुणे' या म्युझिकल ग्रुपचे सर्वेसर्वा, रफी, किशोर, मदनमोहन अशा अनेक गायकांच्या सुरेल अशा गाण्यांनी आणि आपल्या सुमधुर आवाजाने प्रेक्षकांवर मोहिनी टाकणारं हे व्यक्तिमत्व. संगीतातली कोणतीही गोष्ट असो गायन, वाद्न, संगीत संयोजन चंद्रशेखरना ती अवघड नाही. अनेक प्रसिध्द कलाकारांसोबतही त्यांनी कामे केलेली आहेत. चंद्रशेखर महामुनी हे गायक तर आहेतच शिवाय ते लेखक व कवीही आहेत. ई-सकाळ मध्ये त्यांचे अनेक लेख प्रसिध्द झाले आहेत. असा हा हरहुन्नरी कलावंत आम्हाला आतिथी संपादक म्हणून लाभला आहे, चंद्रशेखरना त्यांचा पुढील प्रवासासाठी हार्दीक शुभेच्छा !!

हा चंद्र फिका वाटतो, गुढ भासतो.... सखे, तू नसताना....
विमनस्क नभी हिंडतो....खुळा हासतो सखे, तू नसताना....

हरपला ओठीचा सूर.... धडधडे ऊर.... मनी काहूर....
डोळ्यात दाटला पूर.... रंग बेनूर.... सखे, तू नसताना //१//

हा उदास वाहे वारा....त्यास आवरा....कुणी सावरा....
शोधितो गंध बावरा....होई कावरा....सखे, तू नसताना //२//

हृदयात कोंडला श्वास....दीर्घ निश्वास....स्तब्ध अवकाश....
चालला रवी अस्तास....ओठी बिभास....सखे, तू नसताना //३//

निशःब्द निळ्या अंगणी.... बघ मुकी शुक्र चांदणी....
व्याकुळ चंद्र मिलनी....कशी विरहिणी....सखे, तू नसताना //४//

का जीवास लावी पिसे....सखे तू असे....होई ग हसे
मनी तुझीच प्रतिमा वसे....तूच तू दिसे.... सखे, तू नसताना //५//

## चंद्र आहे साक्षीला

चंद्र आहे साक्षीला, अन सोबतीला चांदणे
गारवा पौषातला, अन तुझे असे हे वागणे !

हातातल्या हाता तुझ्याही, आस कळली स्पर्शातली
अंतरे झाली कमी , अन तुझे असे हे वागणे !

श्वासात माझ्या रातराणी, गात्रात सा-या मदनबाधा
यजमान सारा देह, अन तुझे असे हे वागणे !

सागराच्या या किनारी, नाही कुणीही दूर कोठे
चिंब भिजलो दोघे तरीही, तुझे असे हे वागणे !

पहिलीच नाही वेळ, नाही पहिलीच काही भेट ही
पहिलीच आहे, संधी तरीही, तुझे असे हे वागणे !

**डॉ. अशोक कुलकर्णी (पुणे)**

## चंद्र निळा

पौर्णिमेचा चंद्र
तुझ्या डोळयात पाहिला
आकाशाचा रंग लेऊनी
चंद्र निळा भासला

निशीगंधी बागेत
श्वास झुला झुलला
चंद्र वेडा चांदण्यात
निळाईने खुलला

ढगामध्ये लपताना
मोह माझा सुटला
निळया निळया चंद्रामध्ये
जीव माझा गुंतला

धावताना स्वप्नात
चंद्राने हात धरला
निळया निळया डोळयात
तुच मला दिसला

भास झाला निळाईचा
पौर्णिमेच्या सोहळयाला
उगाच मला वाटले
चंद्र निळा दिसला

**सौ. कल्पी जोशी (चंद्रपूर)**

## चांदवा

नितळ काळया पृष्ठावरल्या

तुला पहाता चंद्र स्मरावा

अन स्मरावा आरोप जुना

परप्रकाशी चांदण्यांचा !

चंद्ररूपेरी साज तुझा हा

आणि भास मना चांदणरातीचा

अंधारी बुडल्या दिशांना

अलवारसा तो चांद गुलामा !

सावल्यांचा शाप तुलाही

अन शाप मलाही जड देहाचा

काळा करडा अभ्र दु:खाचा

तुज पाहता वितळुनी जावा !

नितळ काळया पृष्ठावरल्या

तुला पाहता चंद्र स्मरावा !

**स्वाती फडणीस (मुंबई)**

## गुपित

शारद सुंदर चंदेरी रात

स्वप्न झुला उंच आकाशात

कृष्णसखा येई स्वप्नात

अवखळ हसू राधेच्या अधरात

ढगाआडूनी तो चंद्र हसे

गुपित नयनी राधेच्या दिसे

लागले कृष्ण सख्याचे पीसे

मुरली मोहन प्रसन्न हसे

यमुना तिरी रास रचवुनी

गोपिकांना खेळात दंगवुनी

शरदाच्या त्या टिपूर चांदण्यात

कृष्ण रमे राध्येच्या मनमंदिरात

**सुनील जोशी (नागपूर)**

## एका चंद्रासाठी

सांज गर्भारली, चंद्र प्रसवेल । घर उजळेल, सृष्टी हरखली

सांज प्रसवली , टपोर चांदणी । आली ग़ अंगणी , सृष्टी उसासली

फिरून सांजेला, चंद्राचे डोहाळे । कौतुक सोहाळे, होती अतोनात

पुन्हा एकवार, सांजेच्या अंगणी । नवीन चांदणी, कौतुक ओसरे

कितीतरी झाले, नवस सायास । दिवा लावायास, चंद्र नाही आता

आभाळ भरून, चांदण्यांची दाटी । एका चंद्रासाठी, किती आटापिटा

थकली भागली, सांज मावळली । जन्माची काहिली, भोग नवसाचे

आक्रीत कसं हे, झाल एकाएकी । लोक म्हणे, लेकी कपाळ करंट्या

आली नवी सांज, एका चंद्रासाठी । चांदण्यांच्या पाठी, दुर्दैवाचा हात

नव्या सांजेलाही, नव्याची चाहूल । चंद्राचीच हूल, इथून - तिथून

सांज कौतुकाच्या, मख्खरी बसली । हळूच हसली, गर्भात चांदणी

कूणीतरी बोले, "चंद्र नाही बाई" । सरे नवलाई, सांज पिसाटली

गर्भातच विरे, चांदणहुंकार । दाटला अंधार, रिते घरदार

सोसती चांदण्या, जन्माची आबाळ । झुरत आभाळ, एका चंद्रासाठी

**क्रांती सडेकर (नागपूर)**

## चंद्रनहाण

पिंपळावरून पिंगळा बोलला
सपान चांदाचा निजल्या रातीला //१//

पानात पिंपळ चांदण हासला
डोहात आसरा झिम्माड नाचल्या //२//

वेळूच्या बनात माडाच्या कानात
वाराही धावून बोंबले जोरात //३//

गाभ्यास रातीच्या जुगला चांदुल्या
रातीन् काढल्या आभाली रांगोल्या //४//

आंब्याच्या राईत राघुच्या ढोलीत
डोल्यात मैनेच्या चांदणा शारद //५//

चंदेरी सपान डोल्याच्या शिपीत
शिवरी कणीस कापते डोल्यात //६//

सागरी शिपीत चांदुल्या बंदीत
मैनेच्या देहात राघुच्या पंख्वात //७//

पिंपळावरून पिंगळा बोलला
नाहला दवात रातीचा चांदुला //८//

**अनुराग कौशिक (मुंबई)**

**माझ चंद्राच वेड**

त्याला माहित आहे माझ चंद्राच वेड ..........
तो नहमीच माझा चंद्र असतो..........

डोळयातला अन डोळयांच्या डोहातल्या प्रतिबिंबातला
तो नेहमीच माझा चंद्र असतो ..........

तरीही अवसेला तो विरह देवून जातो
लपुन रहातो ढ़गात अन..........

काजळी पसरलेली असते आकाशात
शुभ्र चांदण्याच आकाश त्याच्याविना सुनसुन होत

तरीही माझं चंद्राच वेड काही संपत नाही........
मी वाट बघते माझ्या चंद्राची
तो नेहमीच माझा चंद्र असतो........

एक कोर डोकावते हळूच नभात
दिसता तो मला तो असतो माझ्या ग़ालावरच्या खळयात



अख्ख्या तारांगण आम्हीच असतो
तो कोर चंद्राची , मी त्याची चांदणी

ह्या धडधडत्या हृदयाचा
तो नेहमीच माझा चंद्र असतो..........

बहरात येतो तो  येता रात पुनवेची
रात ही होते अशी चंदेरी

माझ्या प्रत्येक  रातीचा तोच स्वामी असतो
प्रणयाचा क्षण कैफाचा ......

धुंद मिलनाच्या क्षणी
तो नेहमीच माझा चंद्र असतो..........

डोळयातल्या अन डोळयांच्या डोहातल्या प्रतिबिंबातला
तो नेहमीच माझा चंद्र असतो..........
तो नेहमीच माझा चंद्र असतो..........

**स्वाती  देशमुख (मुंबई)**

# चंद्र, ती आणि मी

आता अंधार पडेल........
मग चंद्र येईल साथीला, मी हरवून जाईन,
त्याच्याशी गप्पा मारेन
त्याला विचारेन तुझ्याबद्दल
तो म्हणेल - आहे  बरी !
मी म्हणेन "सांग ना हकीकत खरी"
तो डिवचेल मला
म्हणेल  - हातात मोबाईल समोर कॉम्प्युटर
SMS पाठव ईमेल कर

" पाठवला असता रे
पण अशी मजा सेंडमध्ये नाही
प्रेमिकेचा क्षेम विचारायला
तुझ्यासारखा friend नाही

मग खुलेल तोही.....सांगेल,
तू येतेस आजही
त्या खिडकीशी
त्याला बघायला........

"बर अजून ???"

सांगेल की तुझ्या तारकांच हिशोब जास्त आहे
"कसा??"
म्हणेल उशिरा लागतो डोळा तिचा,
जाग ही लवकरच येते तुझ्यापेक्षा

सकाळी उठून सवयीने
तुला करते पहिला message
" पण ... पण ... मला नाही येत तिचा मेसेज
तू साला IT वाला ..... logical !
तिने स्वतःचा नंबर सेव्ह  केला तुझ्या नावाने
त्या नावालाच मेसेज करून
हसते  हळूच तुझं नाव inbox मध्ये बघून

"बरं बरं अजून ??"

हसेल गालात,

अजून काय??

बास इतकच !

आहे बरी......तुझी परी !
अन
मग सांगेल हकीकत खरी
संसारात रमली आहे......सुखात आहे
inbox मधले message वाचते
आणि डिलीटही करते......
पोराला झोपवताना उशीर होतोच
नव-यासाठी डब्बाही लवकर उठून बनवते

मी निघताना पहाटे शेवटी......
म्हणेल, एक मात्र खरं सांगू ??
कधीतरी हरवून माझ्याकडे बघताना,
नवरा विचारतो,
चंद्रामध्ये कोणाला हुडकतेस ??
ती म्हणते......तुलाच............!!

**विनायक उजळंबे (पुणे)**

# शारदीय संध्याकाळ

डोळे बंद केले अन शारदीय संध्याकाळ

निळाशार तळ्याचा काठ

तुझी वाट .....

डोळे बंद केले अन पुसुन टाकलं सारं काही

पापण्या किलकिल केल्या, सावरून घेतलं काहीबाही....

चांदण भरलं नक्षीदार नभ

मधाळ दुधाळ पूर्ण चांदवा

ओंजळीत झेलणारे माझे हात....

डोळे बंद केले अन पुसुन टाकलं सारं काही

पापण्या किलकिल केल्या, सावरून घेतलं काहीबाही....

एक आकाश डोक्यावर

एक तळ्यात, एक डोळ्यात

अलगद स्पर्शी तवंगाचा थरथराट

डोळे बंद केले अन पुसुन टाकलं सारं काही

पापण्या किलकिल केल्या, सावरून घेतलं काहीबाही....

वेचून आभा , बुडवून नभा

ओजस्वी प्रभा....

डोळे बंद केले अन पुसुन टाकलं सारं काही

पापण्या किलकिल केल्या, सावरून घेतलं काहीबाही....

मानस मोहीनी स्वप्नांचा गाव

कुरतडणारे घाव

ठरलेला ठाव

डोळे बंद केले अन पुसुन टाकलं सारं काही

पापण्या किलकिल केल्या, सावरून घेतलं काहीबाही....

चंद्रमाधुरी ओलावा, क्षीण  सुरातील पावा

नित्य तोच दुरावा

डोळे बंद केले अन पुसुन टाकलं सारं काही

पापण्या किलकिल केल्या, सावरून घेतलं काहीबाही....

**सुरूची नाईक (नागपूर)**

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरीने १००चा पल्ला गाठला. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

## ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-नियतकालिके

ई-स्टाप, स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम, बालनेटाक्षरी

**प्रसिद्ध झालेली ई-बुक्स**

- टल्लीची शाळा
- मकरंदच्या त्रिवेण्या
- ग्रेव्हयार्ड लिटरेचर
- चार क्षण
- तो आणि ती
- प्रियेचे अभंग
- देशी दारुचे दुकान-3D

**प्रसिद्ध झालेली ई-बुक्स**

- ई-शाळा
- तो, मी आणि सिगरेट
- मोरया
- लोकल गोष्टी
- मीरा अनुवाद
- ऑथंब
- सावळ्या मुलीची गाणी

वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**esahity@gmail.com**

**नेटाक्षरीचा** हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**netaksharee@gmail.com**

आता ई-साहित्यची वरील सर्व ई-प्रकाशन उपलब्ध आहेत सी डी मध्ये “५० रुपयांत १११ ई-पुस्तके”

**संपर्क करा ९८६९६७४८२०**

**www.esahity.com**

नेटाक्षरी